पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन)
योजना, २०१७..
अंमलबजावणीबाबत सूचना..

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:- बीएमसी-२५१६/प्र.क्र.१५१९/२०१६/नवि-२१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०९ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) अधिनियम २०१४, दिनांक १ मे, २०१४ पासून लागू केला. या अधिनियमातील तरतुदी संपूर्ण राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यक्षेत्रात लागू आहेत. अधिनियमाच्या कलम ३६ मधील तरतुदींचा राज्य शासनाने पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) नियम २०१६, दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी प्रसिध्द केले आहेत. तद्नंतर कलम ३८ मधील तरतुदींनुसार, अधिनियमाच्या अनुसूची-२ मध्ये दिलेल्या बाबींसंदर्भात पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) योजना-२०१७ तयार करण्यात आली असून, सदर योजना शासनाच्या नगर विकास विभागाच्या संकेत स्थळावर उपलब्ध आहे.

सदर योजनेतील तरतुदींची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने, अनुषंगिक सूचना देणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय**

पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) योजना-२०१७ ची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने खालील मुद्दयांच्या अनुषंगाने सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्वरीत कार्यवाही करावी:-

| अ.क्र. | मुद्दा | कार्यवाही |
|---|---|---|
| १. | नगर पथविक्रेता समिती गठीत करणे | नगर पथविक्रेता समिती गठीत करण्याबाबत दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी प्रसिध्द केलेल्या नियमातील नियम ११ मध्ये तरतुद आहे. त्या तरतुदीनुसार पथविक्रेता समिती गठीत करण्यासंदर्भात सर्व महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषदा यांनी कार्यवाही करावी.<br>नियम ११ मध्ये दिलेल्या नगर पथविक्रेता समितीच्या रचनेनुसार त्यात पथविक्रेत्यांच्या प्रतिनिधींचा समावेश करणे आवश्यक आहे. तथापि, नगर पथविक्रेत्यांचे प्रतिनिधी निवडणुकीद्वारे नियुक्त करणे आवश्यक आहे. त्यासाठी पथविक्रेत्यांचे सर्वेक्षण होऊन नोंदणी झालेल्या व पथविक्री प्रमाणपत्र देण्यात आलेल्या पथविक्रेत्यांची यादी तयार होणे आवश्यक आहे. त्यामुळे पथविक्रेत्यांचे प्रतिनिधी वगळता अन्य सदस्यांची नगर पथविक्रेता समिती स्थापन करण्याबाबत प्रथमत: कार्यवाही करण्यात यावी व या समितीमार्फत सर्वेक्षण करुन पथविक्रेत्यांची |

| | | |
|---|---|---|
| | | नोंदणी करणे व त्यांना पथविक्रेता प्रमाणपत्र देण्याबाबत योजनेतील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी. तद्नंतर पथविक्रेत्यांच्या प्रतिनिधींची सदर नगर पथविक्रेता समितीवर निवडणुकीद्वारे नियुक्ती करण्याबाबत त्वरेने कार्यवाही करण्यात यावी. |
| २. | सध्याच्या पथविक्रेत्यांचे सर्वेक्षण | पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) नियम २०१४ मधील तरतुदी तसेच, पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) योजना २०१७ च्या प्रकरण २ मधील संबंधित तरतुदींच्या अनुषंगाने अधिनियमातील तरतुदींचे पालन करुन ६ महिन्यांत अचूक सर्वेक्षण करण्याची कार्यवाही करण्यात यावी. |
| ३. | विक्री प्रक्षेत्रे निर्धारित करणे | योजनेच्या प्रकरण क्रमांक ७ मधील सूचनांनुसार सर्वेक्षण करुन विक्री प्रक्षेत्रे निश्चित करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. |
| ४. | सर्वेक्षणात आढळलेल्या पथविक्रेत्यांना पथविक्रेता प्रमाणपत्र व ओळखपत्र देणे | योजनेच्या प्रकरण ३ मध्ये नमूद केल्यानुसार सर्वेक्षणानंतर पथविक्रेत्यांची अंतिम यादी प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत नोंदणीकृत पथविक्रेत्यांना योजनेचया जोडपत्र-२ व जोडपत्र-३ अन्वये विहित केलेल्या नमुन्यामध्ये प्रमाणपत्र व ओळखपत्र देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी आवश्यक असल्यास यासंदर्भात पुरक सूचना निर्गमित कराव्यात. या सूचनांचे पालन करणे सर्व महानगरपालिका व अन्य नागरी स्थानिक संस्थांना बंधनकारक असेल. |
| ५. | अपिलीय प्राधिकरणाची नियुक्ती | पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) नियम २०१६ च्या नियम ९ मधील तरतुदींच्या अनुषंगाने अपिलीय प्राधिकरणाची नियुक्ती करण्यात यावी. |
| ६. | तक्रार निवारण व विवाद निर्णय समिती गठीत करणे | पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) नियम २०१६ च्या नियम ३ व ४ मधील तरतुदींनुसार तक्रार निवारण व विवाद निर्णय समिती गठीत करण्यात यावी. |
| ७. | मा. उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक २२४/२०११ व जनहित याचिका क्रमांक ३६/२०१० केळवणी मंडळ विरुध्द बृहन्मुंबई महानगरपालिका यांमध्ये दिलेले आदेश तसेच याचिका क्रमांक | मा. उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक २२४/२०११ व जनहित याचिका क्रमांक ३६/२०१० केळवणी मंडळ विरुध्द बृहन्मुंबई महानगरपालिका यामध्ये आदेश पारित करताना परिच्छेद ५६ मध्ये दिलेल्या निदेशाची प्रत परिशिष्ट-अ म्हणून सोबत जोडली आहे. |

| | | |
|---|---|---|
| | १३४३४/२०१६ श्रमिक जनता फेरीवाला संघटना आणि इतर विरुध्द राज्य शासन आणि इतर या याचिकांमध्ये दिलेले आदेश | याचिका क्रमांक १३४३४/२०१६ मध्ये उपरोक्त आदेश, सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रमुखांना कळविण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने निदेश दिले आहेत.<br>योजनेचे कार्यान्वयन करताना मा. उच्च न्यायालयाचे वरील निदेश लक्षात घेऊन त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. |
| ८. | पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) अधिनियम, २०१४ तसेच त्यानुषंगाने प्रसिध्द करण्यात आलेले नियम व योजना यांचे कार्यान्वयन | अधिनियम, नियम व योजना यांचे कार्यान्वयन व अंमलबजावणी करण्याची जबाबदारी सर्व महानगरपालिका व अन्य नागरी स्थानिक प्राधिकरणांची असेल. अधिनियम, नियम व योजना यांमधील तरतुदी आणि विविध न्यायालयीन निर्णय यांच्या अनुषंगाने कालबध्द कार्यक्रम आखुन प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी स्थानिक प्राधिकरणांनी आवश्यक त्या सर्व उपाययोजना कराव्यात. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१७०१०९१५४९३८४३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Sharadchandra Gokhale

Digitally signed by Sanjay Sharadchandra Gokhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay Sharadchandra Gokhale
Date: 2017.01.11 12:48:10 +05'30'

**(सं.श.गोखले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
२. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
४. सर्व अप्पर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
५. आयुक्त, सर्व महानगरपालिका / मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती
६. संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
८. निवडनस्ती, नवि-२१

# परिशिष्ट-अ

## याचिका क्रमांक २२४/२०११ व जनहित याचिका क्रमांक ३६/२०१० केळवणी मंडळ विरुध्द बृहन्मुंबई महानगरपालिका यांमध्ये दिलेले आदेश

56. Hence, we dispose of the Petitions by passing the following order :-

(i) We hold that with effect from 1st May, 2014 the directions issued by the Apex Court from time to time in Civil Appeal Nos.4156-4157 of 2002 (Maharashtra Ekta Hawkers Union and others vs. Municipal Corporation of Greater Mumbai and others) shall cease to apply and all existing street vendors as on 1 st May, 2014 who are covered by the definition of clause (l) of Section 2 of the Street Vendors Act are entitled to protection against eviction and relocation as provided under Sub-section (3) of Section 3 thereof. No Street Vendors who were carrying on business as on 1st May, 2014 and who are covered by the definition of Street Vendor under clause (l) of Section 2 shall be evicted or relocated by the Mumbai Municipal Corporation till the survey as specified under Sub-Section (1) of Section 3 of the Street vendors Act is carried out and the certificates of vending are issued to all Street Vendors in accordance with Sub-section (1) of Section 4 by the Town Vending Committee. This protection is applicable only to those Street Vendors who were carrying on 65 of 70 66 wp-224.11, pil-36.10 business as on 1st May 2014;

(ii) Those Street Vendors who have started street vending after the said date shall be evicted by the Mumbai Municipal Corporation in accordance with law. The action of eviction shall be initiated as expeditiously as possible;

(iii) We declare that a Street Vendor who is engaged in cooking or preparation of food items in a street, lane, side walk, footpath, pavement, public park or any other public place or private place either from a temporary built structure or by moving from place to place is not covered by the definition of street vendor under clause (l) of Section 2 of the Street Vendors Act and consequently such a vendor shall not be entitled to protection under Sub-section (3) of Section 3 so long as he is indulging in cooking or preparation of food items;

(iv) We, therefore, direct the Mumbai Municipal Corporation to initiate action of eviction in accordance with law against Street Vendors who are engaged in preparation/cooking of food items in street, lane, side walk, footpath, pavement, public 66 of 70 67 wp-224.11, pil-36.10 park or any other public place or private area either from a temporary built structure or by moving from place to place and who do not stop cooking or making food within the time specified in a notice served to them. Action of eviction shall be initiated by the Mumbai Municipal Corporation after following due process of law against such Street Vendors immediately on expiry of a period of two months from today;

(v) We direct the Municipal Corporation to ensure that when such action of eviction is proposed, caveats shall be filed in appropriate Courts and the Municipal Corporation shall take prompt steps

to contest the proceeding if filed for challenging the action of eviction. We direct the Municipal Corporation to create a tracking system for all such litigations so that the same are promptly attended to;

(vi) We direct the Traffic Police to take necessary action in accordance with law for preventing indiscriminate parking of vehicles by the customers of the stalls on the said Gulmohar road and nearby streets. Sufficient Traffic Police shall be deployed on the said roads 67 of 70 68 wp-224.11, pil-36.10 during the rush hours;

(vii) We direct the Principal Secretary of the Urban Development Department of the State Government to file affidavit setting out the outer limit within which the following actions shall be completed by the State Government :-

(a) Formulation of the scheme for street vendors under Sub-section (1) of Section 38 of the Street Vendors Act;

(b) Framing of the Rules in accordance with Section 36 of the Street Vendors Act; and

(c) Constitution of Town Vending Committees in each local authority;

(viii) The aforesaid affidavit shall be filed within a period of one month from today. Before setting out the outer limit, the State Government shall make a note that the time provided to the State Government under the Street Vendors Act has expired long back;

(ix) We direct the Mumbai Municipal Corporation to file an affidavit setting out the outer limit within which the plan for street vending shall be prepared from the date on which the Town Vending Committee is 68 of 70 69 wp-224.11, pil-36.10 constituted for the said local authority. Such affidavit shall be filed within the period of six weeks from today. The compliance affidavit reporting compliance with the directions issued in terms of clauses (ii) and

(iv) shall be filed on or before 31st January, 2016;

(x) For considering the compliance affidavits to be filed by the State Government and the Municipal Corporation, the Petition shall be listed on 21 st December, 2015;

(xi) We direct the Mumbai Municipal Corporation to take steps for implementation of order dated 21st January, 2002 in Writ Petition No.1799 of 2001 immediately on expiry of a period of two months from today.

Affidavit of compliance on this aspect shall be filed on or before 31st January, 2016;

(xii) The suits listed in paragraph 51 above pending in the City Civil Court at Dindoshi shall be disposed of as expeditiously as possible and in any event within a period of one year from. This direction be communicated by the Registrar (Judicial-I) to concerned Court;

(xiii) Rule issued in the above Petitions is made partly.

*****************